**शास्त्रीय कला, चित्रकला क्षेत्रात प्राविण्य मिळविणाऱ्या व लोककला प्रकारात सहभागी होणाऱ्या विद्यार्थ्यांना सवलतीचे वाढीव गुण देण्याबाबतची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-संकीर्ण - २०१६ / प्र.क्र. २०२ / एसडी-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७ जानेवारी, २०१७

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एचएससी - १०९७/(१४४४ /९७ ) /उमाशि-१, दिनांक: २६ जून,१९९७
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एचएससी - १७०७/(२२२ /०७)/उमाशि-१, दिनांक: २५ मार्च, २०१०
३) शासन शुध्दीपत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एचएससी - १७०७/(२२२ /०७)/उमाशि-१, दिनांक: ०९ जून, २०१०
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एसएससी - २०१२/(१५४ /१२)/उमाशि-२, दिनांक: २१ एप्रिल, २०१५

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२ अन्वये इयत्ता ११ वी मध्ये प्रवेश देताना कला व क्रीडा क्षेत्रात प्राविण्य मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांना अनुक्रमे २ व ३ टक्के जागा राखीव ठेवण्याबाबत शासनाने धोरण निश्चित केले आहे. संदर्भाधीन शासन निर्णय क्र.४ नुसार माध्यमिक शालांत प्रमाणपत्र (इ. १० वी ) व उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र (इ. १२ वी) परीक्षेत प्रविष्ट होणाऱ्या राज्य,राष्ट्रीय व आंतराष्ट्रीय पातळीवर सहभागी झालेल्या खेळाडू विद्यार्थ्यांना क्रीडा सवलतीचे वाढीव १५ ते २५ गुण देण्याबाबतची सुधारीत कार्यपध्दतीबाबतच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत.

क्रीडा क्षेत्रासोबतच शास्त्रीय कला, चित्रकला क्षेत्रात प्राविण्य मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांना त्यांच्या कलेचा उपयोग त्यांच्या भविष्याच्या प्रगतीपटासाठी होणे आवश्यक आहे. तसेच, लोककला हे समाज प्रबोधनाचे माध्यम आहे. लोककलेची वाढ व संवर्धन करण्याचे काम अनेक शालेय विद्यार्थी शालेय जीवनात करीत असतात. अशा विद्यार्थ्यांना प्रोत्साहन म्हणून माध्यमिक शालांत प्रमाणपत्र (इ. १० वी ) परीक्षेमध्ये क्रीडा गुणांच्या धर्तीवर सवलतीचे वाढीव गुण देण्याची कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शैक्षणिक वर्ष सन २०१७-१८ पासून शास्त्रीय कला,चित्रकला या क्षेत्रात प्राविण्य मिळविणाऱ्या व लोककला प्रकारात सहभागी होणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्च, २०१८ पासून होणाऱ्या माध्यमिक शालांत प्रमाणपत्र (इ. १० वी ) परीक्षेमध्ये पुढीलप्रमाणे वाढीव गुणांची सवलत देण्यात येईल.

**१) शास्त्रीय कला :-**

१.१. शास्त्रीय नृत्य,गायन व वादन यामध्ये ज्या विद्यार्थ्याने कमीत कमी ५ वर्षाचे शिक्षण मान्यताप्राप्त संस्थेतून घेतले आहे, तसेच त्याने मान्यताप्राप्त संस्थांची ३ परीक्षा उत्तीर्ण केली असल्यास १० गुण व ५ परीक्षा उत्तीर्ण केली असल्यास १५ गुण देण्यात यावेत.

१.२ जे विद्यार्थी शास्त्रीय नृत्य, गायन व वादन या प्रकारात राष्ट्रीय, राज्यस्तरीय पारितोषिक / शिष्यवृत्ती प्राप्त करतील अशा विद्यार्थ्यास वाढीव २५ गुण देण्यात यावेत. तथापि, अशा पात्र विद्यार्थ्यास उपरोक्त १.१ मध्ये नमूद केल्या प्रमाणे १० अथवा १५ गुण अनुज्ञेय राहणार नाही.

१.३ कला क्षेत्रातील विद्यार्थ्यांना अतिरिक्त गुण देण्यासाठी ग्राह्य धरण्यात येईल अशा संस्थांनी पुढील निकष पूर्ण केलेले असावेत.

अ. संस्था किमान १० वर्षापासून अस्तित्वात असावी.

ब. सदर संस्थेची नोंदणी धर्मादाय आयुक्तांकडे झालेली असावी.

क. संस्थेकडे मागील ३ वर्षाचा लेखा अहवाल असावा.

सदर प्रमाणे निकष पूर्ण करणाऱ्या संस्थांना सांस्कृतिक कार्य विभागामार्फत मान्यता देण्यात यावी. सांस्कृतिक कार्य विभाग याबाबतची जाहिरात प्रसिद्ध करून संस्था नोंदणी करणासाठी विहित कालावधी निश्चित करेल. सदर कालावधीत संस्थाना नोंदणी करणे आवश्यक राहील.

१.४ विद्यार्थ्याने सांस्कृतिक कार्य विभागाची मान्यताप्राप्त संस्थानी आयोजित केलेल्या ३ किंवा ५ परीक्षा शालेय जीवनात म्हणजे इ.१० वी पर्यंत केव्हाही उत्तीर्ण केलेली असावी.

१.५ ज्या संस्थांची नोंदणी सांस्कृतिक कार्य विभागाकडे असेल, त्या संस्थेचे प्रमाणपत्र विद्यार्थ्याने प्राप्त केलेले असल्यास विद्यार्थी ज्या शाळेत इ.१० वी शिकत आहे, त्या शाळेच्या मुख्याध्यापकांमार्फत ते तपासून प्रमाणित करण्यात येईल. तसेच विद्यार्थ्याने उत्तीर्ण केलेल्या परीक्षांप्रमाणे त्याला अतिरिक्त गुण देण्याची (३ परीक्षासाठी १० गुण, ५ परीक्षासाठी १५ गुण व राष्ट्रीय/राज्यस्तरीय पारितोषिक / शिष्यवृत्ती प्राप्त विद्यार्थ्यास २५ गुण) व त्याप्रमाणे राज्य मंडळास कळविण्याची जबाबदारी संबंधित शाळा मुख्याध्यापकांची राहील.

१.६ कला क्षेत्रातील कोणत्या प्रकारासाठी (शास्त्रीय गायन/नृत्य/वादन) अतिरिक्त गुण दिले आहेत ते राज्यमंडळाने संबधित विद्यार्थ्यांच्या गुणपत्रिकेमध्ये नमूद करण्यात यावे.

**२) लोककला :-**

२.१ शासनाने लोककलांना अनुदान देण्याच्या योजनेतंर्गत अनुदान मंजूर करण्याचे निकष सांस्कृतिक कार्य विभागाच्या शासन निर्णय दि.०१.०१.२००८ अन्वये जाहीर केले आहेत. प्रयोगात्मक लोककला प्रकारात किमान ५० प्रयोग सादर करणाऱ्या संस्थांना / मंडळांना सांस्कृतिक कार्य विभागामार्फत विद्यार्थ्यांचे प्रमाणपत्र देण्यासाठी मान्यता देण्यात यावी.

२.२ सांस्कृतिक कार्य विभाग याबाबतची जाहिरात प्रसिद्ध करून संस्था नोंदणी करण्यासाठी विहित कालावधी निश्चित करेल. सदर कालावधीत संस्थांना नोंदणी करणे आवश्यक राहील.

२.३ सांस्कृतिक कार्य विभागाकडील नोंदणीकृत संस्था / मंडळाचे प्रमाणपत्र कला क्षेत्रातील विद्यार्थ्यांना अतिरिक्त गुण देण्यासाठी ग्राह्य धरण्यात येईल. वाढीव गुण अनुज्ञेय असणाऱ्या प्रयोगात्मक लोककला प्रकारांची निश्चिती सांस्कृतिक कार्य विभागाने करावी.

२.४ . इ.८वी,९वी व इ.१० वी या शैक्षणिक वर्षात विद्यार्थ्याने प्रयोगात्मक लोककला प्रकारातील किमान ५० प्रयोग सादर केले असल्यास सदर विद्यार्थ्यास १० अतिरिक्त गुण, तसेच किमान २५ प्रयोग सादर केले असल्यास सदर विद्यार्थ्यास ०५ अतिरिक्त गुण देण्यात येतील. लोककला सादरीकरणातील निर्मितीच्या कोणत्याही घटकामध्ये सहभागी असणाऱ्या विद्यार्थ्यास सदरप्रमाणे अतिरिक्त गुण देण्यात येतील.

२.५ इ.८वी, ९वी व इ.१० वी या शैक्षणिक वर्षात राज्य शासनातर्फे घेण्यात येणाऱ्या बालनाट्य स्पर्धेत प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक पटकावणाऱ्या विद्यार्थ्यास अनुक्रमे १५,१० व ०५ अतिरिक्त गुण देण्यात येतील.

२.६ राज्य शासनातर्फे घेण्यात येणाऱ्या बालनाट्य स्पर्धेत विभाग स्तरावर प्रथम क्रमांक मिळवणाऱ्या विद्यार्थ्यास ०५ अतिरिक्त गुण देण्यात येतील. तथापि, सदर विद्यार्थ्याने राज्य स्तरावर प्राविण्य मिळविल्यास त्यास प्राविण्यनिहाय निश्चित केल्याप्रमाणे (प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक पटकावणाऱ्या विद्यार्थ्यास अनुक्रमे १५,१० व ०५) गुण देण्यात येतील. अशा विद्यार्थ्यांना विभागस्तराच्या प्राविण्यासाठी लागू असणारे गुण अनुज्ञेय होणार नाहीत.

२.७ इयत्ता १ ली पासून शालेय स्तरावर कोणत्याही वर्षी राष्ट्रीय स्तरावरील अभिनय पुरस्कार प्राप्त होणाऱ्या बाल कलाकारास १० अतिरिक्त गुण, तसेच राज्य स्तरावर प्रस्तुत पुरस्कार प्राप्त होणाऱ्या बाल कलाकारास ०५ अतिरिक्त गुण देण्यात येतील.

२.८ भविष्यात लोककला क्षेत्रात काम करणारे अभ्यासक, संस्था व मंडळ यांनी प्रयोगात्मक लोककला संदर्भातील अभ्यासक्रम तयार करावा. सदर अभ्यासक्रम तपासून व प्रमाणीकरण करण्याबाबतची यंत्रणा सांस्कृतिक कार्य विभागाने निश्चित करावी. याकरिता स्वतंत्र अभ्यास समिती स्थापन करण्यात यावी. सदर अभ्यासक्रमाच्या चार परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यास २० अतिरिक्त गुण व तीन परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यास १५ अतिरिक्त गुण देण्यात येतील.

२.९ उपरोक्त सर्व बाबी तपासून विद्यार्थ्यांना लोककला प्रकारामध्ये अतिरिक्त गुण देण्याची तसेच राज्य मंडळास कळविण्याची जबाबदारी संबंधित शाळा मुख्याध्यापकांची राहील.

**३) चित्रकला :-**

३.१ इंटरमिजीट ड्रॉईंग ग्रेड परीक्षेतील ग्रेड A प्राप्त विद्यार्थ्यांना १५ गुण, ग्रेड B प्राप्त विद्यार्थ्यांना १० गुण व ग्रेड C प्राप्त विद्यार्थ्यांना ५ गुण देण्यात येतील.

३.२ कला क्षेत्रासाठी असणाऱ्या २ टक्के आरक्षणामध्ये शास्त्रीय गायन/नृत्य/वादन या कला प्रकारात प्राविण्य मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांसोबत चित्रकलेची इंटरमिजीट ड्रॉईंग ग्रेड परीक्षा उत्तीर्ण विद्यार्थ्यांचा देखील समावेश पुढील शैक्षणिक वर्षापासून करण्यात येत आहे.

एखादा विद्यार्थी एकापेक्षा जास्त संस्थामध्ये कला विषयक व क्रीडा विषयक शिक्षण घेत असल्यास व एकापेक्षा जास्त कला अथवा क्रीडा विषयांमध्ये प्राविण्य प्राप्त करीत असला तरी त्यास सवलतीचे अतिरिक्त गुण देण्याची कमाल मर्यादा २५ गुण असेल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०१७०१०७१६३८१३८४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नवाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.01.07 16:42:48 +05'30'

**( डॉ. सुवर्णा सि. खरात )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रिडा विभाग), मंत्रालय, मुंबई.
२) मा. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य विभाग), मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) मा. शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक, विद्याप्राधिकरण, पुणे.
६) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
७) क्रीडा संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) कला संचालक, कला संचालनालय,मुंबई
१०) अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ, पुणे.
११) विभागीय अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक विभागीय शिक्षण मंडळ (सर्व).
१२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
१३) सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक)
१४) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक)
१५) सर्व शिक्षण निरीक्षक, मुंबई (पूर्व ,पश्चिम, उत्तर)
१६) निवड नस्ती (एसडी - २).